खंडांत आहे त्यावर नेहेमीं पडून त्यास उपद्रव देत असत. व **सायरस** राजा ह्मणजे ज्याणें **फारस** देशचें राज्य स्थापित केलें त्याचाही त्यांणींच पराभव करून तो मारून टाकिला होता (त्यामुळें त्यांविषयीं लोकांचे मनांत फारच दहशत राहात होती) त्या जाग्याजवळ **शिकंदर** पोहोंचतांच त्याचे फौजेचें मनांत भय प्राप्त होऊन त्या लोकांनीं ज्योतिषी यांस सांगितलें कीं, **शिकंदरास** तुह्मी असें समजवावें कीं, त्या लोकांशीं लढाई केली असतां तुमचा जय होणार नाहीं. (त्याप्रमाणें ज्योतिष्यांनीं केलें) परंतु जो **हेलिस्पांट** खाडी व **युफ्रेटीज** व **टाइग्रीज** ह्या दोन्ही नद्या उतरावयास भ्याला नाहीं तो असे कृतिमांनीं फसणारा नव्हता. त्याणें तखत्यांच्या सांगडी तयार करवून उतरण्याचें अणखी कांहीं सामान जमा केलें, आणि आपण चांगले मुहुर्ताची वाट पाहात बसला. ज्योतिषी लोक हे त्यास मोडती घालीत, परंतु त्याणें त्यांचें बोलणें मान्य केलें नाहीं, यामुळें ते अगदीं निराश झाले. बाजेवाले लोक **शिकंदराचे** हुकुमानें नदीचे कांठीं उभे राहून वाद्यें वाजवूं लागले. तीं वाद्यें नदीपलीकडील रानवटी लोकांस अगदींच माहीत नव्हतीं ह्मणून वाद्यांचा शब्द ऐकतांच ते मागले पायीं परत जाऊं लागले. हें पाहून **शिकंदरानें** तुतारी वाजवावयास हुकूम देऊन तखत्यांचे सांगडीवरून फौजेनिशीं पार उतरून लढाईचे कायद्याप्रमाणें आपली फौज उभी करून त्यांवर हल्ला केला. **टारटर** लोक हे क्षणभर लढतांच पराभव पावून पळून गेले त्यांचे पाठीस **शिकंदर** लागला, परंतु चालतांना त्यास गरमी होऊन तो थंड पाणी प्याला, यामुळें

त्याचा घाम बंद होऊन एकाएकीं निःश्वेष्ट पडला. त्या वेळेस लोक त्यास घेऊन तंबुस परत आले. तो बरा होत आहे तों इतक्यांत **टारटर** लोकांकडून विनंतीपत्र असें आलें कीं आह्मी आपणाशीं विनाकारण लढाई केली, त्याबद्दल आमचा अपराध क्षमा करून तहनामा करावा. तो अर्ज **शिकंदरानें** मान्य करून त्यांशीं तहनामा केला, याप्रमाणें जे **टारटर** लोक सर्वांस अजिंक होते त्यांचा **शिकंदराचे** हातून पराभव झाला. हें वर्तमान लोकांत प्रगट झाल्यावर **शिकंदराचा** इतका फायदा झाला कीं जे लोक त्यास त्या वेळेपर्यंत राजसन्मान देण्यास **अनमान** करीत होते ते देऊं लागले.

जरी **शिकंदर** बादशाहास ह्या मोठमोठ्या मोहिमांत यश प्राप्त होत गेलें तथापि त्याचे बहुत दिवसांचे भरभरीमध्यें त्याचा एक वेळ पराभवही झाला. त्याविषयीं पुढें लिहितों. **स्पिटेमिन्स** नामें **पारसी** लोकांचा सर्वांहून श्रेष्ठ सेनापति याणें **साग्डिआना** प्रांतामध्यें दंगा केला होता, त्याचा पराभव करण्याकारितां **शिकंदरानें** कांहीं फौज पाठविली होती. त्या फौजेस जरी नेहेमीं यश संपादणें हें सहज होतें तरी **शिकंदर** हा खुद्द जातीनें त्यांचे नजरेसमोर नव्हता यामुळें त्या फौजेचा पराभव होऊन त्या हिकमती सरदारानें ती फौज अगदीं निर्दाळून टाकिली. हें वर्तमान **शिकंदरास** समजतांच तो थोडीशी निवडक फौज बरोबर घेऊन नेहेमीप्रमाणें मोठ्या झपाट्यानें कुच करून चार दिवसांत **समर्कंद** ह्मणजे ऐन दंग्याची जागा तेथें जाऊन पोहोंचला. हें ऐकून तो **पारसी** सरदार वाळूचे मैदानांत पळून गेला, आणि **शि-**

**कंदरानें** जेथपर्यंत त्यास ठीक दिसलें तेथपर्यंत त्याचा पाठलाग करून ज्या ज्या आसपासचे गांववाल्यांनीं त्याचे फौजेशीं लढाई केली होती, अथवा जे बेपरवा राहिले होते त्यांस शिक्षा केली.

साहावे वर्षीचें युद्ध पुरें झालें आणि **शिकंदराची** फौज हिंवाळ्याचे बराकांतून राहिली त्या वेंळेस त्याचे हातून एक मोठी दुःखदायक गोष्ट घडली, तशी त्याचे जन्मांत कधींही झाली नव्हती. त्याणें **एशिया** खंडांतील संपूर्ण प्रसिद्ध मुलुक जिंकून त्यांत आपली बादशाही स्थापित करण्याचा निश्चय केला होता ह्मणून त्याणें **एशियां**तील बादशाहाचे चालीप्रमाणें पोषाक करून त्या देशांतील रीतीप्रमाणें सर्वांस कुरनिष करण्याविषयीं आज्ञा केली होती ती नवी चाल त्याचे कडवे जातभाई ह्मणजे त्याचे संपूर्ण परिश्रमाचे सोबती यांचे मनास न येऊन ते कुरकुर करीत व कधीं कधीं नाराजी होऊन त्याचा धिःकार करीत असत. याशिवाय **शिकंदराची** चाल जरी वावगी नव्हती तरी त्यास एक वाईट व्यसन होतें असें कीं तो कधीं कधीं दारू पीत असे. एके दिवशीं एके मोठे मेजवानीमध्यें मंडळीबरोबर फारच दारू पिऊन तो मनास वाटेल तशी बडबड करूं लागला, व **क्लाइटस** नामें त्याचे दाईचा भाऊ, ज्याणें **ग्रानिकसचे** लढाईंत त्याचा प्राण वांचविला तोही त्याबरोबर दारू पिऊन उन्मत्त झाला आणि दुसऱ्यास राग यावयाजोगें भाषण करूं लागला. त्या भाषणांचा त्याणें पुनः मोठ्यानें उद्गार केला, तेव्हां **शिकंदरास** त्याचें सहन न होऊन त्याणें रागानें एक बर्ची उचलून त्यास मारिली, ती ला-

गतांच त्याचा प्राण गेला. तेव्हां आपले अतिप्रिय मित्राचें आपलेच हातानें रक्त जमीनीवर पडलेलें पाहून तो शुद्धीवर आला आणि त्यास मोठा पश्चात्ताप झाला त्या दुःखामुळें त्यानें तीन दिवसपर्यंत अधोमुख राहून घरगुती किंवा सरकारी कामांत अगदीं मन घातलें नाहीं. शेवटीं त्याचे सेनापतींनीं त्याचें समाधान करून त्यास उद्योगास लाविलें.

त्याची सातवे वर्षाची लढाई इतकीच कीं **सागडिआना** व **बल्ख** या देशांतील दंगे मोडिले. त्यांत त्यास अतिशयित मेहनत पडली. परंतु तिजपासून कांहीं कीर्ति मिळाली नाहीं. सारांश त्याचे लढाईच्या बारा वर्षांमध्यें हेंच वर्ष त्यास प्रतिकूळ व दुःखदायक झालें. यास्तव आह्मी इतकेंच दर्शवून पुढें आठवे वर्षाचे युद्धाचा वृत्तांत सांगतों. त्या वर्षी **शिकंदर** हा, एक अजिंक किल्ला घेण्याबद्दल लढाई करीत असतां त्या किल्ल्यांतील सरदाराची **राक्सेना** नामें कन्या **शिकंदराचे** हातीं लागली तिचें सौंदर्य पाहून **शिकंदराच्या** मनांत मोह उत्पन्न होऊन त्याणें तिशीं विवाह केला. तेणेंकरून तेथील राहाणारे लोक त्यास इतके अनुकूळ झाले कीं, ते शेवटपर्यंत त्यापाशीं प्रमाणीकपणानें वागले.

त्यावर **शिकंदराने** आपले मनांत **हिंदुस्थान** जिंकण्याचा निश्चय केला, परंतु त्या देशावर स्वारी करण्याचेपूर्वी त्याणें **फारस** देशचे बादशाही शिकारखान्यांत कांहीं दिवस राहून शिकारींत खुद्द आपल्या हातानें एक वाघ मारून आपली बाहादुरी जाहीर केली. त्या प्रसंगीं त्याचे एका खिजमतगारानें शिकारीचे काय-

द्यास विरुद्ध असें एक काम केलें, तें असें कीं तो **शिकंदर** व वाघ यांचे दरमियान आला. तेव्हां ह्या अविचारी कामाबद्दल **शिकंदरानें** त्यास कोर्डे मारविले. तेव्हां या अपमानाबद्दल त्याणें आपले धन्यास मारण्याचा प्रयत्न केला, आणि त्या मसलतींत अणखी कितीएक लोक घेतले. परंतु ती मसलत लवकरच उजेडास येऊन **शिकंदरानें** त्या गुन्हेगारांस जिवें मारून टाकिलें. परंतु त्यांस मारावयास पाठविण्याचेपूर्वी त्या गुन्हेगारांनीं **कालिस्थिनिस्** नामें मनुष्य हा या मसलतींत सामील होता असें सांगितलें. तो मनुष्य जातीचा दांडगा तंटेखोर ब्राह्मण होता. तो **शिकंदराचे** लष्करावरोबर **ग्रीस** देशापासून आला होता, व तो स्वच्छंदीपणानें वागून वारंवार अपराध करीत असे. त्यास **शिकंदरानें** हल्लींचे गुन्ह्याबद्दल कैदेंत टाकिलें असतां तेथेंच त्याचा अंतकाळ झाला. याविषयीं **शिकंदराचे** खास पाहाऱ्याचे सरदारानें **शिकंदराचे** जन्मवृत्तांतांत लिहिलें आहे कीं, तो ब्राह्मण कैदेंत मरण पावला.

परंतु **शिकंदराचे** शत्रू असें लिहितात कीं, त्या बादशाहानें त्याचे हाल करून नंतर त्यास फांशीं दिलें. या पैकीं जो वृत्तांत खरा मानावयाजोगा असेल तो वांचणारांनीं खरा मानावा.

उन्हाळा लागल्यावर **शिकंदर हिंदुस्थान** जिंकावयास (ह्मणजे त्याचे शेवटचे व सर्वांहून बाहादूरीचें काम तें करावयास) चालला, तों लवकरच **काबूल** ह्मणजे बहुधा त्याचेच वसविलेलें शहर त्यास येऊन तेथें त्याणें **हिंदुस्थानांतील** सर्व राजांस आपणास राजसन्मान द्यावयास बो-

लाविलें. त्या राजांपैकीं **टाकसिलिज** नामें एक राजा, ज्याचा मुलुख **अटक** नदीचे दोन्ही कांठावरून होता त्याणें मात्र स्वसंतोषानें बोलावणें मान्य केलें (अणखी कोणींही मान्य केलें नाहीं.) यास्तव **शिकंदरानें** आपले फौजेच्या दोन टोळ्या करून एक टोळी पुढें **अटक** नदीस नांवाचा पूल बांधावयास पाठविली, व दुसरी टोळी पुढें आपले बरोबर त्या नदीचे पश्चिमेकडील राहिलेला मुलुख जिंकण्यास नेली. नंतर कांहीं दिवसांनीं तें काम सिद्धीस नेऊन तो **अटक** नदीचे कांठीं अशा एका जाग्यांत येऊन पोहोंचला कीं, तेथें रान फार होतें. त्या जाग्यांत नावा तयार करवून त्यांत फौजेनिशीं बसून तो जेथें त्याणें आपले लोक पूल बांधावयास पाठविले होते त्या ठिकाणास चालला. वाटेस एक **नैसा** नामें शहर लागलें, त्यांत जाऊन त्याची चवकशी केली, तेव्हां त्यांतील राहाणाऱ्यांनीं त्यास सांगितलें कीं, हें शहर **डाइओनिसिअस** ह्मणजे **बेकस** याणें बांधिलें होतें. हें वर्त्तमान ऐकून **शिकंदरास** फार उल्हास झाला आणि त्या शूर पुरुषानें जिंकलेले मुलुखांचे हद्दीपर्यंत मी येऊन पोहोंचलों आतां **हिंदुस्थानास** सहज जाईन अशी त्याणें मनांत गांठ घालून त्या शूरास मागें टाकावयाच्या उमेदीनें **हिंदुस्थानाचे** मध्यभागीं जाण्याचा निश्चय केला: आणि त्या शहरांतून पुनः नावांवर बसून जेथें पूल तयार झाला होता तेथें येऊन पोहोंचला आणि लागलाच आपल्या सर्व फौजेनिशीं त्यांवरून पार उतरून **हिंदुस्थानाचे** मैदानांत दाखल झाला. त्या नदीचे दुसरे ओघाचे पूर्वेकडील मुलुखांत तीन सरदार होते,

त्यांचा तपशील. एक **अबिसिनीज** हा बहुतकरून **काश्मीर** देशचा राजा होता; दुसरा, **टाक्सिलिज** हा, **शिकंदरास** पूर्वींच जाऊन मिळाला होता; तिसरा, **पोरस** ज्याचें राज्य **हैदास्पस** नदी ह्मणजे सांप्रतकाळीं जिला **झिलंम्** असें ह्मणतात त्या नदीचे पूर्वेस होतें. त्या **पोरसानें शिकंदरास** राजसन्मान न देतां त्याची स्वारी अडविण्याकरितां फौज जमविली. तेव्हां **शिकंदर** कुच करून निघाला तो **टाकसिला** शहरास आला. तेथें त्याचे फौजेनें नुकतीच डोंगरांत लढाई केली होती ह्मणून श्रम परिहार करण्याकरितां कांहीं दिवस मुकाम केला होता. त्या शहराखालून **झिलंम्** नदी वाहात होती तिचे पलीकडेचे कांठीं **पोरस** राजाचे भयंकर स्वार चोंही-कडून त्याचा मार्ग रोखून धरण्याकरितां उभे होते, व ती नदी जोरानें व जलदीनें वाहाणारी व अर्धकोस रुंद अ-शी होती. यास्तव त्या स्वारांचे समोर उतरण्याविषयीं **शिकंदराची** निराशा होऊन त्याणें तें काम युक्तीनें कर-ण्याचा निश्चय केला. त्याचे छावणीपासून एक कोसा-वर त्या नदींत एक बेट होतें, तेथें नदी दुभागली होती ते संधान पाहून तेथें **शिकंदरानें** एक आंधेऱ्या व तुफा-नाच्या रात्रीस **शिकंदर** स्वतांच निवडक फौजेनिशीं तेथें गेला आणि ज्या वेळेस मनुष्याची गति समजण्यांत न यावी व चाहूलही ऐकण्यांत न यावी अशा समयीं आपले फौजेस पार उतरूं लागला. ती फौज पाहाटेपर्यंत मोठ्या संकटानें पार उतरली. तों इतक्यांत शत्रूस खबर पो-चून त्याणें स्वारांची एक तुकडी पाठवून लढाई चालू केली. हें **शिकंदरास** समजतांच त्याणें त्या फौजेस

हाकून लाविलें. तेव्हां **पोरस** यास समजलें कीं **शिकंदर** स्वतांच निवडक फौजेनिशीं पार उतरून आला आहे. यास्तव तो आपले मुख्य फौजेनिशीं येऊन **शिकंदराशीं** लढाई करूं लागला. ती लढाई मोठी भयंकर व रक्तश्रावी असून फार वेळ झाली. शेवटीं **शिकंदराचे** अजिंक फौजेनें सर्व संकटें निवारून त्याचा पराजय केला. **पोरस** राजाचे फौजेची दाणादाण होऊन ती पळून गेली, आणि तो **शिकंदराचे** हातीं लागला. परंतु **शिकंदरानें** उदार मनानें त्याची चांगली बर्दास ठेविली. आणि त्याचें सर्व राज्य त्यास परत देऊन त्याशिवाय आसपासचा जिंकलेला मुलुख त्याचे स्वाधीन केला. नंतर तेथून कुच्च करून प्रथमतः **चिनाब** नंतर **रावी** या दोनी नद्या बिनहरकत उतरून पार गेला. कारण कीं तेथील लोक अगदीं हत्यार न धरितां आपोआप त्याचे स्वाधीन झाले. पैकीं **कोथियन्स** नामें **सिंगाल्याचे** लोक यांनीं मात्र त्यास इजा दिली, परंतु शेवटीं त्यांचाही पराभव झाला.

**शिकंदर** मग **बिया** नदीचे कांठीं येऊन पोहोंचला. त्या नदीचे पलीकडे **हिंदुस्थान**वाल्यांस एक मोठे जोरावर राज्य होतें तें **युरोप** खंडांतील कोणीही सरदारानें कधींही पाहिलें नव्हतें. त्या राजाचा मालक **चंद्रगुप्त** नामें राजा मोठा बलिष्ठ व समरांगणीं साहा लाख पायदळ आणवयाजोगा असून हरएक कामांत **शिकंदराचे** योग्यतेचाच होता. परंतु **शिकंदरास** मागल्या जय प्राप्तीमुळें अहंकार प्राप्त होऊन त्याचे मनांत पृथ्वीचे दक्षिण सिमेपर्यंत जाण्याची उमेद उत्पन्न होऊन तो ती नदी उतरून त्या

राजाची **पाटलिपुत्र** नामें राजधानी होती तिजवर चालून जावयास तयार झाला. परंतु त्याचेच फौजेनें पुढें जाण्यास हरकत केली. ते लोक त्याबरोबर अगदीं दम न घेतां नऊ वर्षेंपर्यंत मैदानचे तीक्ष्ण उन्हांतून व डोंगराचे बर्फांतून रात्रंदिवस चालून उन्हाळा व हिवाळा न जाणतां सतत लढाई करीत होते; सारांश जें दुःख त्यांणीं रस्त्यांत सोसलें होतें तसें जगांत पूर्वीं कोणींही सोसलें नसेल; व इतके वर्षांचे युद्धांत नाश पावून जे लोक वांचले होते त्यांचीं शरीरें जखमांनीं भरलेलीं होतीं व मेहेनतीमुळें अगदीं जेरीस येऊन त्यांस आपले कुटुंबांत जाऊन पडण्याविषयीं मोठी उत्कंठा झाली होती. कारण कीं, जर आपण **शिकंदरा**बरोबर अणखी पुढें जे मुलूख विस्तीर्ण व कोणास माहीत नाहींत असें सर करावयास गेलों तर आपणास पुनः घर दृष्टीस पडेल किंवा नाहीं असा संशय त्यांस वाटूं लागला होता, व त्यांचे सरदार ह्मणजे हुद्देदार त्यांचीही तीच अवस्था झाली होती. यास्तव त्यांणीं आपआपला मजकूर आपापल्या हुद्देदारांचे कानावर घातला. तेणेंकरून **शिकंदरास** वाटलें कीं आतां आपलें पुढें जाणें होणार नाहीं. तेव्हां त्याणें त्या लोकांस प्रथम धमकी दिली, मग त्यांच्या दाढ्या धरल्या, व नवीन लढायांत त्यांणीं जी कीर्ति मिळविली होती तीही त्यांस जाणविली, परंतु सर्व व्यर्थ होऊन त्याची पक्की खातरी झाली कीं, आपले फौजेनें पुढें न जाण्याविषयीं दृढ निश्चय केला आहे. यास्तव त्यास मोठे असंतोषानें आपले राज्याची व मोहीमेची **रावी** नदी

हद्द करणें प्राप्त झालें आणि तो लष्करासहित कुच करून परत गेला.

**शिकंदर** बादशाहास वर सांगितल्याप्रमाणें आपली मोहीम पुरी करणें प्राप्त झालें असतां त्याणें आपले बादशाहीची पूर्वेकडील हद्द **अटकनदी** केली असें दिसतें. आतां त्याणें आपले राज्याची दुरुस्ती व बंदोबस्त करण्याबद्दल जे बेत आपले मनांत केले होते ते लक्ष लावून पुरे करण्याचा निश्चय केला. तो **हिंदुस्थानांत** उत्तर दिशेकडील रस्त्यानें गेला होता, परंतु परत जाण्याविषयीं त्याणें निराळा मार्ग योजला. असा तो **अटक** नदीस मिळणाऱ्या नदीच्या ओघांतून नावेंत बसून जाऊन **अटक** नदीस मिळाला. मग **अटक** नदींतून ती नदी समुद्रांस मिळते तेथें पोहोंचला. आणि तेथून जाहाजांत बसून आपले मुलूखास गेला.

**हिंदुस्थाना**पर्यंत त्याच्या स्वारीचें वर्णन करून आह्मी आतां त्याचे अणखी कांहीं पराक्रमाविषयीं लिहितों. तो नदींतून समुद्रास जात असतां **मुलतान**चे लोकांनीं मध्यें येऊन त्यास पुढें जाण्यास हरकत केली. यास्तव त्याणें त्या लोकांशीं लढाई चालविली, परंतु यशःप्राप्तीविषयीं त्याची बहुतकरून निराशा झाली असतां त्याणें ह्या प्रसंगीं मोठा अविचारीपणा केला. असा कीं, एका मजबुत किल्ल्यास वेढा घालून भिंतीवरून आंत उडी टाकून एके भिंतीचे आश्रयानें एकस्थानेंच सर्व योद्ध्यांशीं लढाई केली. त्या लढाईंत त्यास जखमा लागून तो जगेल किंवा नाहीं याविषयीं कांहीं वेळपर्यंत संशय होता, परंतु ईश्वरेच्छेंकरून तो बरा झाला. नंतर

तो जाहाजांत बसून **अटक** नदींतून चालला असतां वाटेनें तीन शहरें बांधून दोन शहरांस कोट बांधिले. तेथून **पटाला** शहरास गेला. हें शहर जेथें त्या नदीचीं दोन मुखें होऊन समुद्रास मिळायास जातात तेथें आहे. त्यास पोहोंचतांच त्याणें एक शहर व एक बंदर अशीं दोन बांधावयास हुकूम दिला. **शिकंदरानें** आपले डोळ्यांनीं **अटक** नदीचीं दोन्हीं मुखें पाहून जीं लढाऊं जाहाजें जमा झालीं होतीं त्यांजवर **नियार्कस** नामें मनुष्यास अधिकारी नेमून नवे मुलखांचे शोधार्थ जाहाजें हाकारून जावयास हुकूम दिला, आणि असें सांगितलें कीं, **टाइग्रीज** नदीचे मुखाचा ठिकाणा लागला तर तोही लावावा. त्याणें **लाल** समुद्र व **फारस** देशांतील नद्या व **अटक** नदी या सर्वांमधून माल जाऊन लोकांचें हित व्हावयाजोगा व्यापार चालून त्याचे योगानें **हिंदुस्थान** व त्याचे नवे संपादिलेले मुलूख यांमध्यें व्यापारद्वारा संबंध ठेवावा असा बेत करून तो सिद्धीस नेण्याकरितां त्याणें मोठा प्रयत्न केला. याप्रमाणें **शिकंदरानें** **नियार्कस** याची रवानगी करून उत्तर दिशेचे रस्त्यानें अणखी कांहीं फौज **कारमेनिया** येथें पाठवून सर्व फौजेंत बळकट व शूर शिपाई होते ते आपलेबरोबर न्यावयास राखून ठेवून आपण समुद्राचे कांठानें चालला. कां कीं प्रसंग पडल्यास आपले जाहाजांची मदत आपणास मिळावी याकरितां जवळ असावें असा बेत केला. नंतर तो **अटक** नदीचे पार उतरून **जिड्रोशिया** नांवाच्या वाळूचे मैदानांत शिरून त्यांतून साठ दिवसांत पार निघून गेला. रस्त्यांत वाळू तापलेली असे व पाणी तर

अगदींच मिळत नव्हतें. यामुळें त्या फौजेस इतके कष्ट झाले कीं, मागील कष्टांशीं व त्यांचीं बरोबरी पाहातां हल्लींचे कष्टापुढें मागील कष्ट कांहींच नाहींत. तथापि **शिकंदर** त्या मैदानांतून पार पडून **करमान** शहरास सुखरूप पोहोंचला. तेथें त्याची बाकीची फौजही येऊन त्यास मिळाली, व त्यास तेथें असें वर्त्तमान समजलें कीं, आपला जाहाजांचा सरदार **नियार्कस** याचा प्रवास सफळ होऊन उमेदीपेक्षां ज्यास्ती काम झालें व त्याचीं जाहाजेंही **टाइग्रीज** नदीचे मुखाजवळ सुखरूप पोहोंचलीं. हें ऐकून त्यास फारच आनंद झाला. हा प्रवास प्राचीन काळचे स्पष्ट लिहिलेले सर्व प्रवासांहून बिकट असून सफल झाला होता.

**क्यारमेनिया** शहरांतून **शिकंदर** निघून ऐन हिंवाळ्यांत **फारस** देशास चालला होता तो **पासागार्दा** नामक शहरावरून जाऊन त्याणें **साइरस** राजा ह्मणजे ज्याणें **फारस** देशचें राज्य स्थापित केलें होतें, त्याचें थडगें पडित झालेलें पाहून त्याचा जीर्णोद्धार करण्याविषयीं हुकूम दिला. त्या नंतर लवकरच एक मोठि चमत्कारिक गोष्ट झाली. **कालेनस** नामें एक विद्वान ब्राह्मण **शिकंदरा**बरोबर **हिंदुस्थाना**पासून गेला होता त्यास आपले जिवाचा त्रास येऊन त्याणें एक चिता तयार करून त्यांत आपणास जाळून घेतलें. परंतु **शिकंदरानें** त्याचा तमाशा पाहाणें पसंत केलें नाहीं. सुमारें ह्याच वेळेस **शिकंदराचे** मनांत ज्या लोकांनीं मुलूख जिंकिला व जे लोक त्याचे स्वाधीन झाले त्या उभयतांमध्यें ऐक्य करावें असा हेतू उत्पन्न होऊन त्याणें **डेरा-**

**यस** राजाचे मुलीशीं लग्न केलें व त्याप्रमाणेंच त्याचे ऐशीं मुख्य सरदारांनींही बहुतकरून **फारस** देशचे श्रेष्ठ कुळांतील लोकांच्या मुलींशीं सभारंभानें लग्नें करून परस्पर सख्य केलें. **शिकंदराचें** लग्न मोठ्या सभारंभानें होऊन त्याचे औदार्याप्रमाणें त्यांत पैसाही व्यवस्थापूर्वक खर्च झाला, तेणेंकरून मोठी कीर्ति झाली. हें औदार्य त्याचे सरदारामध्येंच होतें असें नाहीं. त्याचे बहुतेक शिपायांनींही त्याप्रमाणेंच खर्च करून कर्ज केलें होतें. **एशिया** खंडांत त्यांस पुष्कळ लूट सांपडल्यामुळे व्यवस्थेनें खर्च करण्याची पूर्वींची चाल होती ती सोडून देऊन ते लोक मनास वाटेल तसा खर्च करूं लागले. तेणें-करून त्यांचे पाठीमागून सावकार लोकांच्या झुंडी भूता-सारख्या फिरूं लागल्या. **एशिया** खंडांतील फौज जशी कर्जभरू असती तशी **शिकंदराची** बहुतेक फौज कर्ज-भरू झाली होती. हें **शिकंदरानें** पाहून उदार मनानें असा हुकूम दिला कीं सावकार लोकांनीं सर्व कर्जरोखे आणून लष्करी जामदारखान्यांतून आपले ऐवजाचा उलगडा करून घ्यावा. त्याप्रमाणें ज्यांनीं रोखे हजर केले त्यांस तितका पैसा दिला.

नंतर **शिकंदरानें** जाहाजांत बसून **फारस** देशचे आखातांत जाऊन त्याचे कांठांचा शोध लावून तो कांठा-कांठानें **टाइग्रीज** नदीस गेला. जाहाजांत बसावयाचे पूर्वीं त्याणें आपल्या फौजेस खुषकीनें **स्युजा** शहरास जा-ण्याचा हुकूम दिला होता. त्याप्रमाणें ती तेथें येऊन पोहोंचतांच त्याणें सर्वांस एके ठिकाणीं जमा करून ज्या लोकांस जखमा लागल्या होत्या व जे वृद्ध झाले होते, व

जे दुःखणीं लागून अशक्त झाले होते, त्या सर्वांस निरोप दिला. परंतु त्यांस निरोप दिल्यामुळें सर्वांचे मनांत वांकडें येऊन असा बखेडा माजला कीं सर्वांनींच निरोपाविषयीं एकदम अर्ज केला. परंतु ज्याणें **एशिया** खंडांतील मुलुख सर केला तो अशा क्षुल्लक गोष्टींनीं डगमगणारा नव्हता. त्याणें तख्तावरून खालीं उडी टाकून त्यामध्यें जे, तेराजण मुख्य बखेडेखोर होते त्यांस धरून तेथेंच ठार मारून टाकिलें. परंतु ह्या भयानक उपायानेंही त्यांचीं मनें बदललीं नाहींत, आणि दोन दिवसपर्यंत तो बखेडा तसाच राहिला. तिसरे दिवशीं **शिकंदरानें मासिडोन** देशांतील सर्व शिपायांस दूर करण्याचा विचार करून नवे जिकलेल्या मुलखांतून शूर व अनुभविक असे शिपाई निवडून काढून त्यांची भरती करण्यास हुकूम दिला. असें होतांच बखेडेवाले लोक शुद्धीवर आले, तेव्हां त्यांणीं **शिकंदरास** आपले पश्चात्तापाविषयीं मजकूर समजावून आह्मांवर कृपादृष्टि असावी ह्मणून विनंती केली, ती त्याणें कबूल करून त्यांस त्यांचे कामावर बाहाल केलें. त्यामुळें त्याची त्या लोकांवर पहिलेपेक्षां ज्यास्ती सत्ता झाली, व **फारस** देशांतून लोक आणून त्याणें नवी फौज भरली होती. तिचे योगानें नवे व जुने फौजेपैकीं कोणासही वाढूं न देतां उभयतांस आपले आधीन ठेवणें हें त्यास सुलभ झालें.

याप्रमाणें **शिकंदर** व त्याची फौज यांचें ऐक्य झाल्यानंतर त्याणें दाहा हजार थकलेले लोकांस **क्रेटरस** या नांवाचे सेनापतीबरोबर घरीं जावयास परवानगी दिली. आणि त्या लोकांचीं नांवें पटांतून काढतेवेळेस नेहेमींप्रमाणें

उदारपणानें त्यांस बहुत पैसा इनाम दिला. परंतु ते लोक सतत बारा वर्षेंपर्यंत त्याचे यशस्वी झेंड्यामागून गैरमाहितीचे मुलुखांतून फिरून त्यांणीं अशीं संकटें भोगिलीं होतीं कीं तशीं पूर्वीं जगांत कोणतेहि फौजेनें भोगिलीं नव्हतीं. यामुळें त्यांशीं वियोग होणार ही गोष्ट त्याचे मनास फारच लागली, आणि जेव्हां शिपाईलोक एकेक जण त्यास सलाम करून निरोपाविषयीं विचारावयास आले तेव्हां त्यास फारच गहिवर आला.

एथपर्यंत **शिकंदराचें** पराक्रमाचें वर्णन केलें. आतां आह्मी त्याचे अंतकाळाचा वृत्तांत सांगतों. जुने लोकांस निरोप दिल्यावार एका वर्षानें तो **बाबिलन** शहरास गेला. त्या वेळेस त्याचे मनांत **आरब** लोकांस जिंकण्याचा बेत होता, तो त्याचे राज्याचे स्वस्ततेस आवश्यक होता. यास्तव त्याणें पुष्कळ नवीं जाहाजें तयार करून जमीनीवरील फौज त्यांचे मदतीकरितां सिद्ध केली, आणि जसा पूर्वीं **हेलिस्पांट** खाडी उतरते वेळेस उत्कंठित झाला होता, त्याप्रमाणेंच ह्याही मोहिमेस उत्कंठित झाला, आणि त्याणें स्वतांच हरएक कामाची देखरेख ठेवून यशप्राप्तीची मोठी आशा बाळगिली होती. परंतु **बाबिलन** शहराजवळ दलदलीचे जाग्यांत दारूची निशा त्याजवर असतां तशांत त्यास ताप येऊन त्याचा अंतकाळ झाला. त्यावेळेस त्याचे वयास बत्तिसावे वर्ष होतें, व त्याणें बारा वर्षें राज्य केलें होतें. त्याचेमागें त्याची अशी कीर्ति राहिली कीं जरी त्यास मरून दोन हजार दोनशें वर्षे झालीं तरी अद्यापपर्यंत चालली आहे, व त्याणें राज्य कारभार केला तसा पूर्वीं कोणींही केला नव्हता, व जी राज्यक्रांति त्याणें

केली ती मागील धामधुमीपेक्षां फारच मोठी असून फिरावयाजोगी नव्हती, व ज्या ज्या राज्यांतून नानाप्रकारच्या घालमेली होऊन जीं जलप्रलयापासून कायम राहिलीं होतीं तीं त्याणें नष्ट केलीं, व **एशिया** खंडांतील शक्तीविषयीं जी **युरोपियन** लोकांचें मनांत त्या दिवसापर्यंत जरब होती ती त्याणें नाहींशी करून त्या राष्ट्रामध्यें जो स्वाभाविक जोर होता तो प्रगट करून त्यांस आपला वरिष्ठपणा जगांत स्थापित करण्यास मार्ग दाखविला.

---

## फारस देशचे बादशाहीविषयीं.

साइरस—कंबाइसीज—डेरायस—त्याची ग्रीस देशावरील स्वारी—त्याचें राज्य चालविण्याविषयीं नेम—जरक्सीज—त्याचा ग्रीस देशांतील पराभव—आर्टक्जर्कसीज —फारस देशचे राज्यांतील दंगे—दुसरा डेरायस—मिसरदेश स्वतंत्र झाला—दुसरा आर्टक्जर्कसीज—कुनाकसाची लढाई—एजिसिलेअस याची फारस देशावरील स्वारी—डेरायस कोडोमेनस—फारस देशची बादशाही गारद झाली—या सर्व गोष्टींविषयीं वर्णन पुढें लिहितों.

जरी **फारस** देशचा इतिहास **ग्रीस** देशाचे इतिहासांत मिळवून लिहिला आहे तथापि त्या देशांत, **साइरस** ह्मणजे त्या देशाचा पहिला राजा यापासून **डेरायस** ह्मणजे शेवटचा राजा याचे राज्यापर्यंत ज्या ज्या विशेष गोष्टी झाल्या आहेत त्यांविषयीं स्पष्ट मजकूर ध्यानांत येण्याक-

रितां त्या देशाचा निराळा इतिहास लिहिणें अवश्य आहे.

**साइरस** राजा, ह्मणजे **फारस** देशचें राज्य स्थापित करणारा याचा जन्म वृत्तांत व पराक्रम पूर्वींच **ग्रीस** देशाचे इतिहासांत तपशीलवार वर्णिला आहे, यास्तव या ठिकाणीं इतकेंच दर्शविणें योग्य आहे कीं तो राजा **टारटर** लोकांशीं युद्ध करीत असतां क्रिस्ताचे पूर्वीं ५२९ वे वर्षीं मारला गेला. त्यावेळेस त्याचें राज्य इतकें विस्तीर्ण होतें कीं, संपूर्ण जगांत तसें दुसरें विस्तीर्ण कोणतेही नव्हतें. त्याचे मागें त्या राज्याचा मालक त्याचाच पुत्र **कंबाइसीज** हा झाला, आणि त्याणें **आफ्रिका** खंडावर स्वारी करून **मिसर** व **लिबिया** हे दोन्ही देश सर करून आपले राज्याचे सुभे केले. या देशांत त्याचा अम्मल झाल्यामुळें तेथील धर्माधिकारी ह्मणजे **ब्राह्मण** यांचे अधिकारांस धक्का लागून ते बुडण्याची संधी आली. यामुळें त्यांणीं त्या राजाशीं इतका द्वेष मांडला कीं, त्या देशांत त्याचे मुख्य शत्रू तेच लोक झाले होते. त्यांविषयीं इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, तो अनुचित कर्मी राजा होता, परंतु त्याचे जन्मवृत्तांताविषयींचे कागदपत्र पाहिले असतां ज्या **ब्राह्मणांस** त्याणें इजा दिली होती त्यांपासूनच ते लेख निघाले आहेत, यास्तव त्यांजवर विश्वास न ठेवितां त्यांपैकीं थोडक्याच गोष्टी खऱ्या समजाव्या.

**कंबाइसीज** राजाचे भावाचें नांव **स्मर्डिस** होतें. त्यास त्याणें मारेकरी यांचे हातून **मिसर** देशांत मारविलें. नंतर त्या नांवाचा **मेजाई** लोकांनीं **फारस** देशांत एक

तोतया उभा केला. हें वर्तमान त्या राजास **मिसर** देशांत कळलें, तेव्हां सदरहू दंग्याचा बंदोबस्त करण्याकरितां तो **फारस** देशास चालला. तो रस्ता चालत असतां एके दिवशीं घोड्यावर बसते वेळेस त्याचीच तरवार त्यास लागून तो **एक्बेटाना** शहर तेथें मृत्यु पावला. त्या वेळेस त्यास गादीवर बसून साडे सात वर्षें झालीं होतीं. नंतर **स्युडो-स्मर्डिस**, ह्मणजे तोतया राजा याणें बिनहरकत गादीवर बसून आठ महिनें राज्य केलें. परंतु **पारसी** लोकांस **मेडिया** देशचा मनुष्य स्वदेशचे गादीवर बसला; याचें सहन न होऊन शेवटीं त्या देशचे सात सरदारांनीं कट्ट करून त्यास मारून टाकिलें. तो राजा राज्य करीत असतां त्याणें **मेडिया** देशचीं कळा कौशल्यें **फारस** देशचे फिरस्ते लोकांस शिकविलीं, यामुळें **पारसी** लोक पूर्वीं वडाऱ्यांसारिखे राहात होते ते घरें बांधून राहूं लागले, व कांहीं दिवसांनीं त्यांणीं अशीं सुशोभित शहरें बांधिलीं कीं, तीं शहरें जगांत जीं सर्वांहून सुंदर शहरें आहेत त्यांचीं बरोबरी करूं लागलीं.

नंतर त्या सात वडे लोकांनीं गादीवर नवा राजा बसविण्याविषयीं सभा करून तींत वादविवाद करून **न्हिस्टास्पस** नामक मनुष्याचा पुत्र **डरायस** यास गादीवर बसविलें. त्याणें आपला अधिकार दृढ करण्याकरितां **साइरस** राजाच्या दोन्हीं कन्यांशीं विवाह केला. त्याणें छत्तीस वर्षें राज्य केलें. त्या अवकाशांत मोठा मुलुख कावीज करून **फारस** देशाचे राज्यांत लोकांस सुधारणेच्या कितीएक गोष्टी प्रवृत्त केल्या. त्यामुळें त्याची कीर्ति फार वाढली. त्याणें प्रथमतः **सिथिअन** लोक **काळ्या** समुद्राचे

उत्तरेस राहात होते त्यांवर स्वारी केली, परंतु तींत पराभव पावून त्यास परत यावें लागलें. ही अपकीर्ति मिटविण्याकरितां त्याणें **युरोप** खंडावर स्वारी करून **थ्रेस** व **मासिडोन** हे दोन्ही मुलुख काबीज करून त्यांत आपला अम्मल बसविला. इतक्यांत त्या जाग्यापासून एक हजार कोसांवर त्याचे पदरच्या एके **ग्रीस** देशचे शिपायानें **अटक** नदींतून नवा मुलुख पाहाण्याचे उद्देशानें जाहाजांत बसून जाऊन त्या नदीचे उत्तर दिशेकडील पाहाडी मुलुख काबीज करून **फारस** देशचे राज्यांत मिळमिला, तेणेंकरून ती नदी त्या राज्याचे पूर्वेची हद्द झाली.

परंतु **डेरायस** राजाचे वेळेस विशेष गोष्ट हीच झाली कीं, त्याणें प्रथमतः **ग्रीक** लोकांशीं लढाई केली. तेणेंकरून उभयतां राष्ट्रांचे मनांत असा द्वेष राहिला कीं, तो केवळ **फारस** देशची बादशाही गारद झाली तेव्हां नाहींसा झाला. हा कलह होण्यास असें कारण झालें कीं, प्रथमतः **एशियामैनर** देशांत दंगा झाला, तो मोडण्याकरितां **पारसी** लोकांनीं फौज पाठविली. त्या फौजेनें **अयोनियाची** राजधानी **मिलिटस** नामें शहर जें जगांत तिसरें प्रतीचें सौदागिरिचें आणि **टायर** व **कार्थेज** यांचेच बराबरीचें होतें, त्यावर हल्ला करून तें हस्तगत केलें. याचा सूड **आथेन्स** शहरचे लोकांनीं **सार्डिस** शहर जाळून कसा उगविला, व **डेरायस** राजानें उत्तर दिशेकडील पाहाडी रस्त्यानें जाऊन **ग्रीस** देशावर कसा हल्ला केला, व त्याचा पराभव कसा झाला, व तो दुसरे वर्षीं आपले फौजेनिशीं **ग्रीस** देशावर पाण्यांतून समोरचे रस्त्यानें कसा गेला, व **मारेथन** नामक जाग्यांत

त्याच्या फौजेचा पराभव पुनः कसा झाला, याविषयीं आ-
ह्मी **ग्रीस** देशचे इतिहासांत पूर्वींच वर्णन केलें आहे,
त्या पराभवामुळें जी अप्रतिष्ठा झाली ती मिटविण्याविषयीं
त्याणें सक्त मेहनत केली. परंतु दुसरे युद्धाची तयारी
होत आहे तों इतक्यांत त्याचा अंतकाळ झाला.

**साइरस** राजाचे वेळेस **फारस** देशांत प्रथमतः राज्य
करण्याविषयीं कांहीं नेम चालू झाले. त्याणें आपले
राज्याचे वीस सुभे करून दर सुभेदारानें दर वर्षास अ-
मुक पैसा हुजूर पाठवून द्यावा असा ठराव केला, व सद-
रहू सुभेदार आपले स्वाधीन राहावे ह्मणून फौजेचा अ-
धिकार दुसरे कामदारांस देऊन हुजुरून दर सुभ्यांत
सरकारी दिवाण नेमून त्याचे मार्फतीनें आपले हुकूम त्या
सुभेदारांस कळावे असें केलें. शिवाय तो दर वर्षास
एक वेळ हुजुरून कोणी कामदार पाठवून अथवा स्व-
तांच जाऊन त्या सुभेदारांच्या कामाची देखरेख करीत
असे. कामदार लोक यांची खबर राजास किंवा रा-
जाची खबर कामदारांस लवकर समजावी ह्मणून डांक
बसविली होती. जरी त्या राजानें अशा बंदोबस्तानें सु-
भेदारांस आपले हुकुमांत ठेविलें होतें, तथापि राजा व
सुभेदार यांमध्यें जसे जसे अंतर अधिक होतें तसे तसे
ते सुभेदार राजास फार कमी मान देत होते. त्या सु-
भेदारांपासून ठरविलेला पैसा हुजूर बहुधा नगद येई.
कधीं कधीं लहणेंही येत असे. या सर्व गोष्टींवरून असें
दिसून येतें कीं **डेरायस** राजाचे वेळेस **फारस** देशचे
राज्याचा अति उत्कर्ष झाला. तो राजा क्रिस्ताचे पूर्वीं
४८६ वे वर्षीं मृत्यु पावला. त्याचे मागून गादीवर **ज**-

**र्क्सीज** पहिला हा राजा झाला. तो लहानपणापासून राज्यमाहालांत जनानखान्यांतच होता. यामुळें त्यास मिजाशीशिवाय राज्य कारभारासंबंधी कोणतीही गोष्ट माहीत नव्हती.

तो गादीवर बसल्यावर प्रथमत: विशेष गोष्ट हीच झाली कीं, त्याणें **ग्रीस** देश जिंकण्याबद्दल मोठा प्रयत्न चालविला, परंतु **ग्रीक** लोकांनीं हिम्मत धरून त्याशीं युद्ध करून शेवटीं त्याचा पराभव केला. याविषयीं तपशीलवार वृत्तांत **ग्रीस** देशाचे इतिहासांत सांगितला आहे. या मोहिमेंत त्या राजास जय प्राप्त झाला नाहीं, यामुळें **ग्रीस** देशावर **पारसी** लोक हल्ले करीत होते तें बंद झाले, आणि इतकेंच विशेष झालें कीं, त्या राज्यांतील मनुष्यें व पैसा बाहेर जाऊन राज्य अगदीं डबघाईस आलें. त्याचा पराभव झाल्यापासून तीस वर्षेंपर्यंत **ग्रीक** लोक **एशियामैनर** देशांतील आपले स्वजातीय लोक यांचा स्वतंत्रपणा राखण्याकरितां **फारस** देशचे राज्यावर नेहेमी हल्ले करीत होते, व बहुत दिवस लढाई चालल्यामुळें **पारसी** लोकांचें सामर्थ्य कमी होऊन त्यांस **एशियामैनर** देशाचें रक्षण करण्याकरितां राज्यांतील सर्व फौज एके ठिकाणीं जमा करणें प्राप्त झालें. तथापि त्यास **ग्रीक** लोकांस लढाईंत जिंकण्याचा पराक्रम न राहून शेवटीं **फारस** देशचे राजानें त्या लोकांस पैसा देऊन फितूर करण्याविषयीं प्रयत्न केला, परंतु **सिमन** नांमें **आथेन्स** शहरचा राजा हा अशा तदबीरींनीं फितूर व्हावयाजोगा नव्हता. त्याणें एकेच दिवशीं **युरिमिडन** येथें **पारसी** लोकांचीं जाहाजें व फौज यांचा नाश करून

**थ्रेसिअनचसौंनिजस** हा मुलुख सर करून **युरोप** खंडांत जाण्याचा नाका त्यापासून हिसकावून घेतला. या वृत्तांताशिवाय त्याचे राज्यांत विशेष गोष्ट कोणतीही झाली नाहीं. त्याणें एकवीस वर्षें राज्य केल्यानंतर **आर्टेबेन्स** नामें त्याचे कृपेंतील एक मनुष्य होता त्याचे हातून मारला गेला.

त्याचा पुत्र **आर्टेजर्क्सीज** हा क्रिस्ताचे पूर्वी ४६५ वे वर्षीं गादीवर बसला. त्याणें चाळीस वर्षें राज्य केलें. तो गादीवर बसतांच **मिसर** देशांत दंगा होऊन **पारसी** लोकांचा अम्मल उठला व **ग्रीक** लोक **सीमन** नामें सरदाराचे हाताखालीं वागून अणखी मुलुख घेऊं लागले. तेणेंकरून **आर्टेजर्क्सीज** राजास त्याचे राज्याचे १६ वे वर्षीं त्या लोकांशीं तहनामा करणें प्राप्त झालें. त्या तहनाम्यांत त्याणें **एशियासंबंधी ग्रीक** लोकांचा स्वतंत्रपणा मान्य करून असा करार केला कीं, **इजिअन्** समुद्रांत जाहाज चालविणार नाहीं व फौज घेऊन **युनान** देशांतील समुद्राचे कांठापासून तीन मजला रस्ता राहिल्यावर पुढें जाणार नाहीं. सदरहू तहनामा झाल्यावर दोन वर्षांनीं **मिगेवाइसस** नामें **सिरिया** देशचा सुभेदार याणें बदलून पडून राजाशीं युद्ध केलें त्यांत त्याचा जय झाला. तेणेंकरून इतर सुभेदारांस असें वाटलें कीं राजामध्यें अगदीं सामर्थ्य नाहीं, ह्मणून त्यांणींही तसेंच केलें. याप्रमाणें राज्य बुडण्याचीं चिन्हें दिसून आलीं. पुढें चाळीस वर्षें राज्य करून तो मृत्यु पावल्यावर लागलेच राज्यांत दंगे झाले. त्याचा औरस मुलगा **दुसरा जर्क्सीज** हा गादीवर बसल्यावर दीड महिन्यानें त्याचे **सा-**

**गाडिआनस** नामें कमसल भावानें त्यास मारून टाकिलें आणि आपण गादीवर बसला. परंतु त्याचे **ओकस** नामक दुसरे कमसल भावानें साहा महिन्यानंतर त्यास मारून आपण गादी बळकाविली, आणि तो **दुसरा डेरायस** अथवा **डेरायस-नाथस** या नांवानें मोडूं लागला. त्याणें १९ वर्षें राज्य केलें; परंतु तीन खोजे यांचे सांगितल्याप्रमाणें तो वागत होता, यामुळें राज्यास उतरता पाया आला. त्याणें **पहिला डेरायस** राजा याचे कायदे मोडून फौजेचा अधिकार सुभेदारांस दिला, तेणेंकरून त्यांस स्वतंत्र होण्यास आपोआप सवड सांपडली, यास्तव त्यांणीं बहुत वेळ दंगे केले. परंतु सरकारास त्यांचे निवारण करण्यास सामर्थ्य राहिलें नव्हतें. यामुळें मारेकरी घालून त्यांस मारून टाकविणें प्राप्त झालें. येणेंकरून राजाची फारच अपकीर्ति झाली. अणखी असें झालें कीं, **मिसर** देश तिसऱ्यानें बदलला व त्या लोकांनीं **फारस** देशचे अम्मलदारांस आपले मुलखांतून काढून दिलें. सारांश त्या राज्यांत इतका अव्यवस्थेचा कारभार झाला होता कीं, जर त्या संधीस **ग्रीक** लोक हे वेडेपणानें **पिलोपोनिजसचे** लढाईंत गुंतले नसते व आपसांत कलह न करिते, तर **फारसी** लोकांची दुर्बलतेची संधि साधून त्यांचें राज्य नष्ट करून टाकिते. **दुसरा डेरायस** राजा हा क्रिस्ताचे पूर्वीं ४०९ वे वर्षीं मरण पावला. त्याचा पुत्र **आर्टेजर्क्सीज दुसरा** हा गादीवर बसला.

नंतर त्याचा धाकटा भाऊ **साइरस** याणें त्याशीं कलह उत्पन्न केला, त्यास त्याची आई **पारिसाटिज** हिचा

आंतून पुस्तपन्हा व दाहा हजार **ग्रीक** लोक यांची कुमक होती. ते लोक व अणखी फौजही घेऊन तो आपले भावाशीं लढाई करावयास आला आणि क्रिस्ताचे पूर्वी ४०१ वे वर्षी **कुनाक्सा** येथें लढाई झाली, तींत **साइरस** पराभव पावून मारला गेला, तेव्हां ते दाहा हजार **ग्रीक** लोक तेथून निघून स्वदेशास परत गेले. त्याचे मर्दुमीचा वृत्तांत **ग्रीस** देशचे इतिहासांत लिहिला आहे. **दुसरा आर्टेजर्क्सीज** याणें **ग्रीक** लोकांस पैसा चारून त्याच्या नेकी खराब व्हाव्या आणि त्यांणीं आपसांत लढाई करावी या हेतूनें पुनः पहिल्याप्रमाणें प्रयत्न केला. परंतु **एजिसिलेअस** नामें **स्पार्टा** देशचा राजा याणें आपले मनांत **फारस** देशचें राज्य नष्ट करण्यास एक वेळ सक्त मेहनत करणेंच बस आहे असें समजून मोठे योद्धयानिशीं **फारस** देशचे मध्यभागीं जाऊन **दुसरा आर्टेजर्क्सीज** याचे मनांत दहशत उत्पन्न केली. परंतु **पारसी** लोकांनीं उदार मनानें फारच पैसा खर्च करून **ग्रीस** देशांत एक नुतन लढाई उत्पन्न केली, आणि **कोनन** नामें **आथेन्स** शहरचा राजा याशीं स्नेह ठेवून **एजिसिलेअस** याची अशी दुर्दशा केली कीं त्यास स्वदेशास परत जाणें प्राप्त झालें, व **फारस** देशचा राजा हा आपले संरक्षण करण्याचे फिक्रिरींत होता तोच **ग्रीस** देशचा पंचाईतदार होऊन त्याणें क्रिस्ताचेपूर्वी ३८७ वे वर्षी **अन्टालसिडास** याचे मार्फत तहनामा केला. त्यांत **ग्रीक** लोकांनीं **एशिया** खंडांतील राहाणारे स्वजातीय लोकांस **पारसी** लोकांचे स्वाधीन केलें. हा तहनामा व्हावयाचे-

पूर्वीं ते लोक **पारसी** लोकांचे हातून सुटून साठ वर्षेंपर्यंत स्वतंत्रपणानें वागले होते.

परचक्राचें निवारण झाल्यावर **पारसी** लोकांत आपसांत कलह उत्पन्न होऊन, जशी **हिंदुस्थानांत** राज्य बुडण्याची संधि जवळ आली, ह्मणजे कांहीं विपरीत गोष्टी घडूं लागतात, त्याप्रमाणें ह्याही राज्यांत होऊं लागल्या. सुभेदार लोक राजाचे अधिकारास मान न देतां आपसांत लढाया करूं लागले, आणि खुद्द राजदरबारांतही फंद, फितुर, व खून होऊं लागले. त्या राजाचा वृद्धापकाळ झाला असतां त्याचे गादीवर बसण्याविषयीं त्याचे तीन औरस पुत्रांमध्यें कलह उत्पन्न होऊन त्यांत **डेरायस** नामें वडील पुत्र होता तो मारला गेला. नंतर दंग्याचें निशाण राज्याचे पश्चिमभागांत उभे होऊन **एशियामैनर** देशांतील सर्व सुभेदार हे व **स्पार्टा** देशचे लोक हेही त्यांत सामील झाले. परंतु **ओरोंटीज** नामें त्यांतील मुख्य दंगेवाला याणें दगाबाजी केली त्यामुळें तो बेत सिद्धीस गेला नाहीं.

ह्या दंग्याचे दरमियान **दुसरा आर्टेजर्क्सीज** राजा हा मृत्यु पावला, त्यावेळेस त्यास गादीवर बसून ४३ वर्षें झालीं होतीं. त्याचे मागून **तिसरा आर्टेजर्क्सीज** नामें राजा झाला त्याणें क्रिस्ताचेपूर्वीं ३६२ वे वर्षापासून ३३८ वर्षापर्यंत ह्मणजे चोवीस वर्षें राज्य केलें. जरी त्याणें गादीवर बसतांच राजाचे कुटुंबांतील सर्व माणसें यांस मारून टाकिलें, तथापि त्याणें मोठे जोरानें राज्य कारभार चालवून कितीएक दंगे मोडून टाकिले, व **मिसर** देशांत पुनः अम्मल केला आणि राज्य इतकें वाढ-

विलें कीं तें पहिले हद्दीस **नेऊन** मिळविलें. शेवटीं त्यास **वेगोआस** या नांवाचे एका खोजानें विष घालून मारून टाकिलें, आणि त्याचा धाकटा पुत्र **आर्सेस** यास गादीवर बसवून त्याचे नांवानें आपण राज्यकारभार चालवावा ह्मणून उमेद बाळगिली; परंतु तो त्याचे स्वाधीन न राहिल्यामुळें दोन वर्षांनीं त्यासही मारून टाकून एक दूरचा नातलक राजाचे घराण्यांतील **डेरायस-कोडोमेनस** हा गादीवर बसविला. त्याणें त्या दुष्ट खोजास मारून टाकून आपला अधिकार दृढ केला ह्या राजास त्याचे पूर्वीचे राजांप्रमाणें जनानखान्यांत पडून राहावयाची तरबियत नव्हती. यामुळें तो त्यापेक्षां अधिक बंदोबस्तानें राज्य करील असें समजून आलें, परंतु गादीवर बसल्यावर दुसरे वर्षीं **मासिडोन** देशचे **शिकंदर** राजानें त्यावर हल्ला केला तेव्हां त्यास अशा जोरावर शत्रूचे सन्मुख आपलें राज्य वांचविण्यास अगदी सामर्थ्य न राहून त्याचें विस्तीर्ण राज्य नष्ट झालें. अंतकाळसमयीं त्या राजाचे फारच हाल झाले. याविषयींचा वृत्तांत **शिकंदर** बादशाहाचे इतिहासांत लिहिला आहे. त्यापेक्षां आतां इतकेंच दर्शविणें योग्य आहे कीं **आर्बेला**ची लढाई व **पर्सिपोलिज** नामें शहराचें दहन झाल्यानें **फारस** देशचे राज्यांतील तेज नाहींसें होऊन **एशिया** खंडांतील लोकांस परजातीचे राज्यांचे प्रभुत्व मान्य करणें प्राप्त झालें.

---

## कार्थेज व सिसिली यांविषयीं.

साइरेक्युज ह्मणजे सिसिली बेटाची राजधानी इचा पाया—जिलो नामें राजा—कार्थेजिनिअन् लोकांची सिसिली बेटावरील स्वारी—त्यांचा पराभव—सिसिली बेटांतील लोक सत्तात्मक राज्याची स्थापना—साइरेक्यूज शहरचा वरिष्ठपणा—कार्थेजिनिअन् लोकांची सिसिली बेटावरील दुसरी स्वारी—डाइओनिसिअस नामें जुलमी राजा—कार्थेजिनिअन् लोकांचा पराभव—आफ्रिका खंडांतील गुलाम लोकांची लढाई—कार्थेजिनिअन् लोकांची सिसिली बेटावरील तिसरी स्वारी—कारिंथ देशाची साइरेक्यूज शहरचे लोकांस कुमक—टिमोलियन् नामें सिसिली बेटचे राजाचा मुख्य अधिकारी—या सर्वांविषयींचें वर्णन पुढें लिहितों.

**कार्थेज** शहरची उत्पत्ति व वृद्धि याविषयींचा वृत्तांत मागील काळांत लिहिला आहे. हल्लीं ज्या काळाचें वर्णन करावयाचें त्यांतील इतिहास हाच आहे कीं, त्या लोकांनीं **सिसिली** बेट जिंकण्याकरितां सक्त मेहनत चालविली होती व ह्याप्रमाणेंच **साइरेक्यूज** नामें **सिसिली** बेटांतील मुख्य शहर याचा उत्कर्ष होऊन त्यांतील राहाणाऱ्यांनींही तोच विचार केला होता. यामुळें उभयतां राष्ट्रांमध्यें द्वेषयुक्त लढाई उत्पन्न झाली तींत अनुक्रमानें उभयतांचा कितीक वेळां जय पराजय होऊन शेवटीं दोन्ही राज्यें **रूमचे** जबरदस्त राज्यांत मिळालीं. यास्तव ह्या काळाचे इतिहासांत **कार्थेजिनिअन्** व **सिसिलियन्** लोकांचे लढाईचे एक मोठें आख्यान आहे ह्मणून उभयतां राजांचा इतिहास नीट रीतीनें एकांत एक मिळालेला याप्रमाणें वर्णिला जाईल.

**साइरेक्यूज** शहराचा पाया क्रिस्ताचे पूर्वीं ७३५ वे वर्षीं **कारिंथ** देशचे लोकांनीं घातला. आणि त्यांत लोकसत्तात्मक राज्याधिकार स्थापून ते लोक दिवसानुदिवस अधिकार व लौकिक यांचे संपादन करूं लागले.

याप्रमाणें त्यांचा त्या शहरांत अडीचशें वर्षेंपर्यंत अम्मल राहिला. परंतु क्रिस्ताचे पूर्वीं ४८४ वे वर्षीं त्या शहरचे राज्यांत आपसांत तंटे होऊन जे लोक पराभव पावले होते त्यांणीं त्या शहराजवळ **जिलोन** नामें दुसरें शहर होतें त्यांतील **जिलो** नामें राजास कुमकेविषयीं अर्जी पाठविली. (तीं मान्य करून) त्याणें बरोबर जबरदस्त फौज घेऊन **साइरक्यूज** शहरास जाऊन जे लोक त्यांतून काढून दिले होते त्यांची स्थापना केली, परंतु राज्याधिकार आपलेच हातांत ठेविला. हा राजा फार थोर होता, व जरी त्याणें सातच वर्षें राज्य केलें तरी त्या अवकाशांत बाहेरून नवे लोक बोलावून शहरची वस्ति वाढविली, आणि परोपकारानें लोकांचीं अंतःकरणें जिंकून नंतर आपले पराक्रमानें तें शहर **सिसिली** बेटांतील इतर शहरांपेक्षां जोरावार केलें. यास्तव तो **राजा साइरक्यूज** शहरचें महत्व वाढविणारा असें ह्मणावयास योग्य आहे.

पूर्वीं आह्मी एका भागांत लिहिलें आहे त्याप्रमाणें जेव्हां **जरक्शीज** नामें **पारस** देशचा राजा याणें **ग्रीक** लोकांस निर्मूळ करण्याचा विचार केला, त्यावेळेस त्याणें **कार्थेजिनिअन्** लोकांस **ग्रीक** लोकांचा **सिसिली** बेट व **इटली** देश यांतील मुलुख जिंकण्याविषयीं लिहून पाठविलें होतें. हा बेत त्या राष्ट्राचे बेताप्रमाणेंच होता ह्मणून त्यांणीं कबूल करून दोन हजार लढाऊ जाहाजांचा समुदाय तयार करून दुसरे तीन हजार उतारू जाहाजांवर तीन लाख फौज बसवून तिवर **हिमिल्को** नामें सरदार नेमून तीं सर्व जाहाजें **सिसिली** बेटांस पाठवून दिलीं. तीं

तेथें दाखल होतांच **हिमिल्को** याणें सर्व फौजेनशीं खुष-कीवर उतरून **हिमेरा** नामक शहरास वेढा घातला. हें वर्तमान **जिलो** नामक राजास समजतांच तो पन्नास हजार पायदळ व पांच हजार स्वार इतक्या फौजेनिशीं त्या शहराचें रक्षण करावयास गेला. त्या संधीस वाटेनें एक जासूद **सिलिनस** शहराहून **कार्थेजिनिअन** लोकांचे लष्करांत जात होता, त्यास **जिलो** याणें धरून आणवून त्याजपाशीं जे कागद होते ते पाहिले. त्यांत असें लिहिलें होतें कीं, अमुक दिवशीं या शहरांतून **कार्थेजिअन** लोकांचे कुमकेस अमुक स्वार पाठविले जातील. त्याप्रमाणें **जिलो** याणें त्या नेमलेले दिवशीं तितकेच स्वार आपले फौजेंतून काढून आपले शत्रु ह्मणजे **कार्थेजिनिअन** लोक यांचे लष्करांत पाठविलें. त्या लोकांस दग्या-विषयीं कांहीं अंदेशा न येतां त्यांणीं त्या स्वारांस मित्रांचे स्वार ह्मणून लष्करांत येण्यास परवानगी दिली. त्या स्वारांचा आंत प्रवेश होतांच त्यांणीं **हिमिल्को** यावर हल्ला करून त्यास मारून टाकून त्याचे जाहाजांस आग लावून दिली. ह्या संधीस **जिलो** याणें आपले मुख्य फौ-जेनिशीं जाऊन **कार्थेजिनिअन** लोकांचे फौजेवर एक-दम हल्ला केला. तथापि त्यांणीं हिम्मत धरून कांहीं वेळपर्यंत मोठें दुर्घट युद्ध केलें. परंतु त्यांचा सरदार मारला गेला व जाहाजांस आग लागली हें पाहून ते हव-लदिल होऊन पळून गेले. ह्या लढाईंत **साइरक्युजन्** लोकांनीं शत्रुची बहुत फौज मारिली. तिची संख्या इतकी सांगितली आहे कीं, दीड लाख मनुष्य रणभूमींत पडलीं, बाकी राहिलेले लोक अशा ठिकाणीं पळून गेले

कीं, तेथें अन्नपाणी मिळणें कठीण होतें यास्तव त्यांस शेवटीं **जिलो** याचे स्वाधीन होणें प्राप्त झालें. ज्या दिवशीं तिकडे **थर्मापिली** नामक घाटींत **ग्रीक** लोक व व **पारसी** लोक यांमध्यें नामांकित लढाई झाली, त्याच दिवशीं इकडेही लढाई झाली, व येणेंकरून कांहीं वर्षेंपर्यंत **कार्थेजिनिअन्** लोकांस **सिसिली** बेट जिंकण्याविषयीं अगदीं उमेद नाहींशी झाली.

ह्या थोर पराभवाचें व नाशाचें वर्तमान **कार्थेजिनिअन्** लोकांस समजतांच त्या लोकांनीं निराश होऊन ज्या रीतीनें तहनामा होईल त्या रीतीनें करावा ह्मणून वकिलांस हुकूम देऊन **जिलो** याजकडे पाठविलें. तो राजा जसा लढाईंत शूर त्याप्रमाणेंच यश प्राप्तीनें तृप्त राहत असे ह्मणून त्याणें त्या वकिलांचें बोलणें कबूल करून फक्त त्याजपासून चाळीस लाख रूपये दंड घेऊन तहनाम्यांत आपले तर्फेनें इतकेंच ज्यास्ती कलम लिहून ठरवून घेतलें कीं **कार्थेजिनिअन्** लोकांनीं आज दिवसापासून शनीस मुलाचा बळी देऊं नये.

ह्या मोहिमेंत **कार्थेजिनिअन** लोकांस यश प्राप्त झालें नाहीं यामुळें त्यांणीं सत्तर वर्षेंपर्यंत **सिसिली** बेटावर पुनः स्वारी करण्याविषयीं अगदीं उद्योग केला नाहीं. सदरहु सत्तर वर्षांमध्यें **साइरेक्यूज** शहरांत ज्या ज्या विशेष गोष्टी झाल्या त्या पुढें सांगतों. **कार्थेजिनिअन** लोकांचा पराभव झाल्यावर **साइरेक्युजच्या** राहाणाऱ्यांनीं **जिलो** यास राज्याभिषेक केला. नंतर त्याणें राज्याधिकार अनुक्रमानें आपले दोन भावांस दिला, परंतु त्यांतून धाकट्यास लोकांनीं जुलमी ठरवून क्रिस्ताचे पूर्वी ४६६ वे

वर्षीं मुलुखांतून काढून दिलें. नंतर त्या बेटांतील सर्व शहरामध्यें पहिलेप्रमाणें लोकसत्तात्मक राज्याधिकाराची स्थापना झाली. त्यामुळें लोक जोरावर झाले, परंतु त्यांचे मनांत थोर पदवी मिळविण्याविषयीं अशी ईर्षा प्राप्त झाली कीं, त्यांतील सर्व शहरें **सिसिली** बेटाचें प्रभुत्व मिळविण्याबद्दल आपसांत लढाया करूं लागलीं. त्या लढाया बहुत दिवसपर्यंत चालल्या. नंतर शेवटीं **साइरेक्यूज** शहरचे लोक **अग्रिजेन्टम्** शहर जिंकून संपूर्ण **सिसिली** बेटाचे निष्कंटक अधिकारी होऊन इतर शहरावर जुलूम करूं लागले. यास्तव **लिओन्टाईन्स** लोक त्याशीं उलटून पडून लढाई करावयास प्रवृत्त झाले. त्या लोकांचे कुमकेकरितां **आथेन्स** शहरचे लोकांनीं **ग्रीस** देशांतून **साइरेक्यूज** शहरावर एक स्वारी केली, ती फार प्रसिद्ध होती. परंतु तींत **आथेन्स** शहरचे लोकांचा पराभव होऊन त्यांचा **ग्रीस** देशांतील अधिकार नष्ट झाला. याप्रमाणें **साइरेक्यूज** शहरचा क्रिस्ताचे पूर्वीं ४१२ वे वर्षीं अति उत्कर्ष झाला, नंतर त्या बेटांतील दुसरे दोन शहरांमध्यें कलह उत्पन्न होऊन त्यांपैकीं एका शहरचे लोकांनीं **कार्थेज** शहरास कुमक मागावयास पाठविलें. त्या शहरचे दरबारांत **सिसली** बेटावर पुनः स्वारी करावी किंवा न करावी याविषयीं वादविवाद होऊन, एकपक्षीं तें संपन्न बेट काबीज करण्याची **कार्थेजिनिअन** लोकांस बहुत दिवसापासून फिकिर होती, यास्तव स्वारी करावी असें ठरलें. परंतु **साइरेक्यूज** शहरचे लोकांनीं नुकतीच **आथेन्स** शहरची फौज मारून टाकून आपला अधिकार वाढविला होता, झ-

णून दुसरेपक्षीं असें ठरलें कीं स्वारी करूं नये. शेवटीं उभयपक्षीं स्वारी करण्याचा बेत ठरून लोकांनीं **हिमिल्को** नामें जो सरदार **जिलो** राजा याचे हातून मारला गेला होता, त्याचाच नातू **हानिबल्** याजबरोबर पुष्कळ फौज देऊन व मोठा जाहाजांचा समुदाय देऊन **सिसली** बेटावर पाठविला. त्याणें **लिलिबियम्** नामें बंदरांत उतरून **हिमेरा** व **सिलिनस** या नांवाचे बंदरास वेढे घालून तीं हस्तगत करून घेतलीं. नंतर त्यांत मोठमोठालीं अनुचित कर्मे करून तो **आफ्रिका** खंडांत परत गेला. ह्या लढाईंत त्या सरदारास यश प्राप्त झाल्यामुळें **कार्थेजिनिअन** लोक जयमत्त होऊन त्यांणीं तीन वर्षांनीं त्यापेक्षां अणखी मोठे स्वारीची तयारी करून तिजवर **हिमिल्को** नामें सरदार नेमिला. त्याणें **सिसिली** बेटांत उतरून **अग्रिजेंटम्** नामें जें शहर त्या बेटांत दुसरे प्रतीचें असून दवलत व वस्ती व मोठमोठ्या इमारती यांमुळें प्रख्यात होतें त्यास वेढा घातला. परंतु आठ महिनेपर्यंत त्या शहरास धक्का लागला नाहीं कारण कीं **सिसिलियन** लोकांनीं शत्रूशीं संग्राम करण्याकरितां त्या जाग्यांत आपली संपूर्ण फौज जमा केली होती. तथापि त्या शहरांत दाणापाणी नाहींसें झाल्यावर त्या लोकांनीं मोठी विपत्ति भोगून शेवटीं एका रात्रीं शहर सोडलें, आणि वृद्ध व जखमी यांस तेथें तसेंच टाकून आपण निघून गेले. दुसरे दिवशीं **हिमिल्को** याणें शहरांत प्रवेश करून ज्या दैवहीन लोकांस आपले जातभावांबरोबर बाहेर निघून जावयास सामर्थ्य नव्हतें त्या बिचाऱ्यांस मारून टाकून तें शहर लुटून फस्त करण्याकारितां आपले जंगी

लोकांस परवानगी दिली. त्या शहराचा नाश झाल्यानें संपूर्ण **सिसिली** बेटांतील लोक भयाभीत होऊन **कार्थेजिनिअन** लोकांशीं संग्राम करावयास फौज जमा होणें अशक्य झालें, तेव्हां **डाईओनिसिअस** नामें नांवाच्या ज्या पुरुषानें नुकताच लोकसत्तात्मक राज्याधिकार नष्ट करून आपण आपले मर्जीप्रमाणें त्या बेटांत राज्यकारभार चालविला होता, त्याणें **कार्थेजिनिअन्** लोकांशीं तहनामा करून जितका मुलुख त्यांणीं जिंकिला होता तितका त्यांस सोडून दिला. नंतर **हिमिल्को** हा आनंद करीत स्वदेशास परत गेला. परंतु तेथें पाहतो तों जरीमरी उठून इतकी हानि झाली होती कीं, बाहेरचे यशःप्राप्तीपासून जो लाभ झाला होता तो त्या हानीपेक्षां फारच कमी होता.

इकडे **सिसिली** बेटांत असें वर्त्तमान झालें कीं **डाइओनिसिअस** राजा **साइरेक्यूज** शहरचा कुल अखत्यार झाला असतां त्याणें संपूर्ण **सिसिली** बेट जिंकण्याची उमेद धरून फक्त आपणास **कार्थेजिनिअन** लोकांशीं शेवटचे लढाईची तयारी करावयास फुरसत मिळावी ह्मणून त्याणें हा तहनामा केला होता. त्याणें हत्यारें घडविण्याकरितां इटली व **ग्रीस** ह्या दोन्हीं देशांतून कारागीर बोलावून आणून **साइरेक्यूज** शहरांत मोठा कारखाना चालू केला. त्यांत रात्रंदिवस घणाचे ठोक्यांचा आवाज होत असे. तो राजा स्वतांच तेथें हजर राहून त्यांकडून काम करवून त्यांस इनामें देत असे. लढाईची सर्व तयारी होतांच त्याणें संपूर्ण राष्ट्राची सभा करून **कार्थेजिनिअन** लोक ह्मणजे **ग्रीक** लोकांचे चिरकाळचे शत्रू

यांविषयीं त्यांचे मनांत वैमनस्य उत्पन्न करून शत्रूंस मारण्याविषयीं सर्व लोकांस उपदेश केला. त्याप्रमाणें **साइरेक्यूज**चे लोकांनीं जे जे **कार्थेजिनिअन्** लोक तहनामा झाल्यामुळें मनांत कांहीं अंदेशा न बाळगतां बिनधोक त्या देशांत घरें बांधून राहिले होते, त्यांजवर दौड करून त्या सर्वांस मारून टाकिलें. हें वर्तमान ऐकून इतर शहरचे लोकांनींही त्याप्रमाणेंच केलें. याप्रमाणें **डाईओनिसिअस** याणें जे जे **कार्थेजिनिअन्** लोक दैवयोगानें त्या प्रसंगास **सिसिली** बेटांत होते त्या सर्वांस दगाबाजीनें मारून **सिसिली** बेटांतील शहरांच्या सोडचिठ्या मागण्याकरितां **कार्थेज** शहरास वकील पाठविले. परंतु उत्तराची वाट पाहाणें हें त्यास योग्य न वाटून त्याणें **मोटिया** नामक शत्रूचा सर्वांहून मोठा शिलेहखाना ज्यांत लढाईचें सर्व सामान होतें, त्यास वेढा घालून हस्तगत करून त्यांतील राहाणारे लोकांस मारून टाकिलें. दुसरे वर्षी **कार्थेजिनिअन्** लोकांनीं अणखी तीन लाख फौज उभी करून तीवर **हिमिल्को** या सरदारास नेमून तो **सिसिली** बेटावर पाठविला. त्याणें केवळ आपला शिलेहखानाच शत्रूपासून परत घेतला असें नाहीं, परंतु त्या बेटांतील सर्व शहरेंही घेऊन खुद्द **साइरेक्यूज** शहरास वेढा घातला. आणि त्यास शेवटचे यशःप्राप्तीविषयीं असा भरंवसा होता कीं, त्याणें तीस दिवसांत आसपासचे मुलखाची धुळधाणी करून ज्या जुन्या इमारती शहराच्या बाहेर बांधिल्या होत्या व ज्यांहींकरून शहरास शोभा होती, त्या सर्व जमीनदोस्त करून टाकिल्या. परंतु ही मनांत योजिलेली आनंददायक गोष्ट घडून न येतां अशा विपरीत

गोष्टी घडल्या कीं, त्याचे लष्करांत जरीमरी आली व उन्हाळ्याचा ऊष्माही तिला सामील झाला, यामुळें त्या लष्करांतील बहुत लोक नाश पावून शेवटीं असें झालें कीं, मरीचे भयानें दुखणेकरी याजवळ जावयास कोणासही धैर्य होईना, यास्तव मुर्द्यास मूठमाती न मिळतां ते तसेच जमीनीवर पडूं लागले. याप्रणाणें **कार्थेजिनियन्** लोकांची दुर्दशा झाली. तों इतक्यांत **डाईओनिसिअस** याणें त्याजवर हल्ला केला. त्याजबरोबर शत्रूचा नाश करण्याकरितां **साइरेक्यूज** शहरचे सर्व लोक आले होते. परंतु संग्राम करावयास **कार्थेजिनिअन** लोकांचा सेनापति **हिमिल्को** यास अगदीं सामर्थ्य राहिलें नव्हतें. ह्मणून त्याणें परत जाण्याविषयीं परवानगी मागितली. परंतु **डाइओनिसिअस** याणें फक्त आपले स्वजातीय लोकांस घेऊन परत जाण्यास रूकार दिला. त्याप्रमाणें **हिमिल्को** याणें रात्रीस कोणास न कळवितां निघून जाऊन **आफ्रिका** खंडांतील मदतगार लोकांस तेथेंच सोडून दिल्हें. त्या लोकांविषयीं **साइरेक्यूजचे** लोकांनीं मनांत अगदीं दया न आणितां त्यांस मारून टाकिलें. इकडे **हिमिल्को** हा **कार्थेज** शहरास सुखरूप पोहोंचला, परंतु त्याचे हातून स्वदेशाचा दुर्लौकिक झाला होता, त्यामुळें त्याचे मनास पश्चात्ताप होऊन त्याणें आपणास घरांत कोंडून घेऊन स्वहस्तें आपला नाश केला.

तथापि **कार्थेजिनिअन** लोकांचीं संकटें इतक्यांतच संपलीं असें नाहीं. **आफ्रिका** खंडांतील ज्या लोकांस त्यांणीं जिंकिलें होतें ते लोक त्यांचे ताबेदारीपासून मुक्त

होण्यास फार दिवसांपासून उतावळे झाले होते. हल्लीं त्यांचे जातभावांस **हिमिल्को** याणें **सिसिली** बेटांत निराश्रित सोडून दिल्यामुळें त्या संतापाचें त्यांस सहन न होऊन दोन लक्ष लोक **कार्थेज** शहरावर चढून जाऊन त्यांणीं त्या शहरास जमीनदोस्त करण्याचा निश्चय केला. परंतु **कार्थेजिनिअन्** लोकांचें नशीब चांगलें होतें ह्मणून त्यांस कांहीं तोशीस लागली नाहीं. कारण कीं ह्या दोन लाख फौजेस कोणी सरदार नव्हता व त्या समुदायांत दुष्काळ पडून ते लोक आपोआप नाहींसे झाले. ह्या संकटापासून पार पडल्यावर **कार्थेजिनिअन्** लोकांनीं पुनः **सिसिली** बेट घेण्याचा इरादा करून **मागो** नामें सरदार यास मोठे फौजेनिशीं त्या बेटावर पाठविलें. परंतु त्याचा तेथें पराभव होऊन तो मारला गेला. त्याचे मागून जो सरदार झाला त्याणें बेटांतून निघून जातों व लढाईचा खर्च भरून देतों असा करार करून तहनामा केला, परंतु त्याजवर सही करावयाचे वेळेस त्याणें असा उजुर केला कीं, मालकाचा हुकूम थोडेच दिवसांत यावयाचा आहे तो आल्याखेरीज आह्मास शहरें सोडून देतां येत नाहीं. याप्रमाणें निमित्त सांगून जी मुदत त्यास मिळाली होती ती तहनाम्याचा विचार करण्यांतच केवळ घालविली असें नाहीं. परंतु लढाईची तयारीही झाली. **कार्थेज** शहरांतून **धाकटा मागो** या नामें एक सरदार फौजेनिशीं त्या बेटास मोठ्या शितावीनें मदतीकरितां येऊन पोहोंचला. त्याणें पूर्वीचें झालेलें बोलणें नाकबूल करून **साइरक्यूज**चे लोकांचा एके नेमलेले लढाईत पराभव करून आपले मर्जीप्रमाणें त्या लोकांस

**तहनामा** करणें प्राप्त केलें. तो तहनामा त्याचे स्वदेशीय लोकांस इतका हितकारक झाला कीं जो मुलुख त्याणें सर केला होता त्यांत त्याचा अम्मल निर्वैर राहिला.

**थोरला डाइओनिसिअस** हा क्रिस्ताचे पूर्वीं ३६८वे वर्षीं विषाचे योगानें मृत्यु पावला. त्याचा पुत्र त्याच नांवाचा राज्याधिकारी झाला. तो फार जुलमी होता ह्मणून लोकांनीं त्यास **सिसिली** बेटांतून काढून दिलें. परंतु त्याणें कांहीं युक्तीनें परत येऊन त्या बेटांतील राहणाऱ्या लोकांचा सुड उगविला. नंतर **साइरेक्यूज** शहरचे कांहीं लोकांनीं **आयसेटा** नामक मनुष्यास आपले कुमकेस बोलाविलें तेणेंकरून त्या शहरांत निरनिराळ्या फळ्या झाल्या. इतक्यांत **कार्थेजिनिअन्** लोक एक मोठा जाहाजांचा समुदाय घेऊन आले ते बंदरापासून दिसूं लागले, तेव्हां लोकांच्या उमेदी खचून त्यांणीं **कारिंथ** ह्मणजे त्यांची मूळभूमी तींतील राहाणारे लोकांस कुमकेविषयीं अर्जी पाठविली. ती त्या लोकांनीं कबूल करून त्या देशांतील **टिमोलिअन्** नामें एक मोठा गुणी मनुष्य होता त्यास फक्त हजार फौजेनिशीं **साइरेक्यूज** शहरास पाठविलें. त्याणें मोठ्या धैर्यानें त्या शहरास येऊन **डाइओनिसिअस** याची अशी दशा केली कीं त्यास यशःप्राप्तीची निराशा झाल्यावरून त्याणें किल्ला सोडून देऊन **कारिंथ** शहरास जाऊन तेथें शाळा घातली. **टिमोलियन्** याजपाशीं फौज फार कमी होती, ही न्यूनता दुसऱ्यास न दाखवावी ह्मणून आपले शाहणपणानें त्याणें भेद जाणणारे लोकांचे मार्फत **कार्थेजिनिअन्** लोकांचे मनांत असा अंदेशा उत्पन्न केला कीं, त्या लोकांचा **मागो** नामें सरदार या-

स दगाबाजीविषयीं भय प्राप्त होऊन त्याणें ती मोहिम प्रस्तुतकाळीं असाध्य आहे असें निमित्त करून सोडून दिली, आणि तो आपले जाहाजांचे समुदायानिशीं स्वदेशास परत गेला, तो समुद्राचे कांठीं पोहोंचतो आहे तोंच त्यास लोकांनीं दगाबाज ठरवून तेथें सुळीं दिलें. इकडे **सिसिली** बेटांत असें वर्तमान झालें कीं **आयसेटा** हा **टिमोलियन्** याचे हस्तगत होऊन **साइरेक्यूज** शहर बखेड्यापासून मुक्त झालें. तथापि **कार्थेजिनिअन्** लोकांनीं पुनः त्या बेटावर स्वारी केली, परंतु **टिमोलियन्** याचे हातून त्यांचा अगदीं पराभव होऊन त्यांणीं जो मुलूख जिंकिला होता त्यापैकीं बहुत मुलूख सोडून देऊन त्यांस तहनामा करणें प्राप्त झालें. याप्रमाणें **टिमोलियन्** याणें तें बेट बाहेरील शत्रूचे हातून मुक्त करून त्याचे दुरूस्तीकरितां बहुत बेत केले, परंतु त्यापैकीं बहुतेक पुरे न होतां तो क्रिस्ताचे पूर्वीं ३३७ सावें वर्षीं मृत्यु पावला. परंतु त्याचे मागें प्राचीन काळचे सर्व सेनापतींमध्यें त्याची मोठी कीर्ति राहिली.

**सिसिली** बेटाचे इतिहासांत दुसऱ्या विशेष गोष्टी **अगाथोक्लस** नामें धनगर याचे अद्भुत कृत्याविषयीं आहेत, परंतु त्याचीं जोखिमेचीं कामें ह्याविषयींचा व **कार्थेज** शहर व **सिसिली** बेट यांत **रोमन** लोकांनीं अम्मल केला त्याविषयींचा इतिहास पुढील काळांत लिहूं.

आह्मी आपले मुळचे संकेताप्रमाणें जें **रूम**चें राज्य **शिकंदरा**चे अंतकाळाचे पूर्वीं सुमारें चार साडेचारशें वर्षें चाललें होतें त्याचे मूलोत्पत्तीचा वृत्तांत न सांगतां वाचणारांस असें सुचवितों कीं, **रूम**ची उत्पत्ति, वृद्धि,

